


**जोत्स्ना प्रकाशन**
६१७, नारायण पेठ,
लोखंडे तालीमजवळ, पुणे ३०






**जोत्स्ना प्रकाशन**
३० सी, खोताची वाडी,
गिरगाव, मुंबई ४००००४


# सत्यकथा

जगदीश काबरे



ज्योत्स्ना प्रकाशन

# स त्य क था

**जगदीश काबरे**

मूल्य चार रुपये



ज्योत्स्ना प्रकाशन





## सत्यकथा

सारं गावं लोटलं होतं खाडीकिनाऱ्यावर. आज तिथं आक्रितच घडलं होतं. संपूर्ण खाडीकिनारा मेलेल्या माशांनी खच्चून भरला होता. वाळूचा एकही कण दिसत नव्हता तिथे! एवढे मासे मरून पडले होते. जणू काही त्यांनी सामूहिक आत्महत्याच केली होती.

प्रत्येक गावकरी एकमेकांना दुसऱ्याला विचारत होता, 'हे कसं काय घडलं?' कुणालाच काही कळेनासं झालं होतं. काय करावं, हे संकट कसं निवारावं हे त्यांना उमजत नव्हतं.

सत्तरी गाठलेला एक म्हातारबा म्हणत होता, "माझ्या उभ्या आयुष्यात असं आक्रित घडलेलं मी पाहिलं नाही. ह्या कलीयुगात लई पापं झालीयत. धर्म राहिला नाही. ग्रामदेवीचा कोप झालाय. अशापायी आपल्या मासेमारीच्या धंद्यावरच गदा येईल. जगणं कठीण होईल."

म्हातारबाचं बोलणं ऐकणारा पुजारी म्हणाला, "खरंय तुम्ही म्हणता ते. आपण सुधारणेच्या नावाखाली देवधर्म सोडून दिला. म्हणूनच देवी कोपलीय. आता तिची शांत करायला हवी. त्याशिवाय हे थांबणार नाही."

तेवढ्यात कुजबूज वाढू लागली. "दादल्याशेठ आले, दादल्याशेठ आले," म्हणून गावकऱ्यांनी दादल्याशेठना अदबीनं वाट करून दिली. आणि त्यांच्या मागोमाग चालू लागले.

दादल्याशेठ त्या गावचं एक भलं मोठं प्रस्थ होतं. त्यांच्या मासेमारीच्या दहाएक आधुनिक मोटार लाँचेस होत्या. त्या समुद्रात खोलवर आत जाऊन प्रचंड मासे गोळा करून आणायच्या. बाकीचे छोटे मासेमारीवाले फक्त खाडीकिनाऱ्यालगतच मासेमारी करायचे. ह्या दादल्याशेठचा गावातच एक मोठा रसायनांचा कारखाना होता. त्या कारखान्यात गावातील जवळजवळ सगळी तरुण पोरं त्यांनी कामाला लावली होती. गावकऱ्यांना व्याजानं पैसे देण्याचा उद्योगही मदत केल्याचा बहाणा करून करायचे. जवळजवळ सगळं गाव त्यांच्याच आधारावर जगत होतं म्हणा ना!

त्यांनी गावात एक शाळाही बांधली होती आणि एक पतपेढीही उघडली होती. अर्थातच ह्या सर्वांवर संचालकपदी तेच होते.

शाळेचे हेडमास्तर आणि त्यांच्या कारखान्यातील काही उच्चपदस्थ अधिकारी एवढीच काय ती गावाबाहेरून आलेली आणि शिकलीसवरलेली मंडळी होती. त्यांना दादल्याशेठचं वागणं माहीत होतं. पण तेही, कशाला त्यांच्याशी उगीच वैर घ्या ह्या विचारानं गप्प होते. याच दादल्याशेठनी गहाणवटीच्या धंद्यातून बऱ्याच गावकऱ्यांच्या जमिनीही आपल्या ताब्यात घेतल्या होत्या. अनेक गैरव्यवहार करून गावात आपला जम बसवला होता. गावचे सरपंच आणि पाटीलही त्यांच्या शब्दाबाहेर नव्हते. पैसा बोलत होता ना!

— तर अशा या दादल्याशेठनी खाडीकिनाऱ्यावर आल्या आल्या एक नजर फिरवली. मेलेल्या माशांच्याकडे नजर टाकली. त्यांच्या मनात विचारांचं चक्र सुरू झालं. आणि एका क्षणात ते स्थिरही झालं. ते चाणाक्ष होते. गावकऱ्यांचा वकूब ओळखून होते. आपल्या मनातले विचार चेहऱ्यावर दिसू न देण्याइतपत ते हुशार होते. गावकऱ्यांच्या चेहऱ्यावरची चिंता त्यांना स्पष्ट दिसत होती. गावकरी आपल्याकडे आशेनं पहात आहेत हे त्यांना जाणवलं.

चेहऱ्यावर सहानुभूतीचा भाव आणून ते म्हणाले, "मित्रहो, मी तुमची चिंता जाणतो. अशा प्रकारे जर सतत मासे मरायला लागले तर आपला धंदा चालेल कसा? ह्यावर काहीतरी उपाय शोधला पाहिजे. आपल्या गावच्या



काही तरुण पोरांनी अंधश्रद्धानिर्मूलनाच्या नावाखाली मागच्या महिन्यात नारळीपौर्णिमेला समुद्रात नारळ टाकून त्याला शांत करण्याच्या कार्यक्रमाला विरोध केला, हे तुम्हांला आठवत असेलच. काय तर म्हणे ऋतुचक्रानुसार समुद्र आपोआप शांत होतो. मग एवढी वर्षं आपल्या पितरांनी चालवलेली ही परंपरा काय मूर्खपणाची आहे? दोन बुकं शिकलीत म्हणजे त्यांना आभाळाला हात लागलेयत असं वाटायला लागलंय त्यांना."

एवढं बोलून एक क्षणभर त्यांनी गावकऱ्यांवरून एक नजर फिरवली. गावकऱ्यांना आपलं म्हणणं पटू लागलंय हे त्यांनी हेरलं आणि पुन्हा आवेशानं बोलायला लागले,

"ह्या अशा उथळ सुधारणावाद्यांमुळंच आपल्या गावावर देवी कोपलीय. त्यांना त्या वेळी काही गावकऱ्यांनीही मदत केली. आणि तो कार्यक्रम गोंधळात पार पडला. त्याचंच हे फळ आहे. अरे, देवाला विसरून कधी माणसाचं भलं झालंय? देवधर्म पहिला, मग इतर सर्व. विज्ञानाचे शोधसुद्धा देवाच्याच करणीमुळं लागले ना? मग देवाचा कुळाचार विसरून कसं चालेल. देवाला जर खूष नाही ठेवलंत तर तो कोपेल नाही तर काय होईल?"

"आता आपल्याला गावदेवीची शांत करून 'चुकलो' म्हणून माफी मागायला हवी. चार खुळी पोरं चुकली म्हणून आपल्या गावाला हा त्रास का? आपणच त्यांच्यावतीनं माफी मागू. देवापुढं कसला आलाय कमीपणा आणि मान अपमान!"

या बोलण्यानं गावकऱ्यांचा दादल्याशेठबद्दलचा आदर वाढला. आता ते दादल्याशेठ सांगतील तसं ऐकायला तयार होते. साऱ्या गावकऱ्यांनी त्यांचं म्हणणं उचलून धरलं. आणि शांत करण्याच्या तयारीला लागावं म्हणून ते देवळाकडं चर्चेसाठी चालू लागले. दादल्याशेठच त्या सभेचे अध्यक्ष झाले. प्रायश्चित्त म्हणून मोठ्या प्रमाणात उत्सव करायचा असं ठरलं. प्रत्येक गावकऱ्याकडून, त्यासाठी यथाशक्ती पैसे देण्याचं आश्वासन दिलं गेलं, काहींनी धान्यही देण्याचं कबूल केलं. दादल्याशेठनी या उत्सवाचा नव्वद टक्के खर्च देण्याचं मान्य केलं. त्यांच्या या औदार्याचं गावकऱ्यांना कौतुक वाटलं. लगेचच तयारी करण्यासाठी कामांची वाटणी झाली. शेठच्या ओळखीनं मुख्यमंत्र्यांना बोलावण्याचं ठरलं. पूजा

करण्यासाठी अर्थातच शेठ सपत्निक बसणार होते. सगळीकडे उत्साहाचं वातावरण निर्माण झालं.

दरम्यान इकडे खाडीकिनाऱ्यावर, परिसरातील गावांमध्ये बातमी पोहोचल्याने त्या गावकऱ्यांचा लोंढाही ही घटना पहायला लोटला होता. त्यामुळं गावाच्या खाडीकिनाऱ्याला जत्रेचं स्वरूप आलं होतं. प्रत्येक जण किनाऱ्यावर जायच्या गडबडीत धक्काबुक्की करत होता. आणि किनाऱ्यावरील मेलेल्या, तडफडणाऱ्या माशांचा खच पाहून अचंबित होत होता.

वर्तमानपत्रांचे छायाचित्रकार वेगवेगळ्या कोनांतून फोटो काढत होते, तर वार्ताहर गावकऱ्यांशी बोलत बोलत बातमी काढत होते. सगळ्या गावात बोंब उठली होती, देवीचा कोप झाला म्हणून. वार्ताहरांनीही दुसऱ्या दिवशीच्या वर्तमानपत्रांत ठळक मथळ्यात बातमी दिली :

'देवीच्या कोपाने गावावर धरला फेर
खाडीकिनारी पडला मेलेल्या माशांचा ढेर.'

दादल्याशेठचा गावकऱ्यांपुढे बोलतानाचा फोटोही छापून आला होता.

दादल्याशेठनी आपले ट्रक लावून रातोरात खाडीकिनाऱ्यावरचे मासे गोळा केले आणि आपल्या कारखान्याच्या आवारात असलेल्या शीतगृहात ठेवण्याची व्यवस्था केली. ते व्यवस्थित धुवून, साफ करून टप्प्याटप्प्याने हवाबंद डब्यांत भरून परदेशी निर्यात करण्याचा विचार होता त्यांचा. गावकऱ्यांना मात्र त्यांनी सांगितले की, ह्या माशांना त्यांच्या कारखान्यात नेऊन भट्टीत जाळून टाकणार, म्हणजे गावात दुर्गंधी वाढायला नको, की ते कुजून रोगराई यायला नको. गावकऱ्यांना दादल्याशेठ गावाची किती काळजी घेतात हे पाहून आता देवमाणूसच वाटायला लागले होते.

इकडे दादल्याशेठ मात्र मनातल्या मनात हिशोब मांडत होते की, या निर्यातीतून त्यांना किती पैसा मिळणार. मग मरेनात का ती परदेशी माणसं!

एका बाजूला गावकरीमंडळी देवीचा कोप शमवायला शांत करण्याच्या तयारीला लागली होती; तर दुसऱ्या बाजूला हेडमास्तरांचा मुलगा विशाल आणि त्याची मित्रमंडळी मात्र वेगळाच विचार करत होती. त्यांना मासे असे एकाएकी हजारोंच्या संख्येनं मरणं हा देवीचा कोप वाटत नव्हता, तर ह्यात कुठंतरी जलप्रदूषणाचा संबंध असावा असं सारखं वाटत होतं. आणि



हे जलप्रदूषण कसं झालं असावं ह्याचा विचार करता करता ते फिरून फिरून गावच्या रासायनिक कारखान्याशी येऊन ठेपत होते. आणि कारखाना तर दादल्याशेठच्या मालकीचा होता. त्यांच्याशी युद्ध पुकारणं म्हणजे बेडकांनी बैलाशी झुंज देण्यासारखं होतं – निदान आजच्या घटकेला तरी. पुन्हा त्याच कारखान्यातून हे जलप्रदूषण घडलंय हे सिद्ध करणं आवश्यक होतं. नुसत्याच विचारानं काय होणार? त्यांना एवढं मात्र कळत होतं की, दादल्याशेठचा कारखाना गेल्या दोन वर्षांत सुरू झाल्यापासून हळूहळू खाडीतील जलचरांचं प्रमाण कमी झालं होतं. मासेमारीसाठी होड्या किनाऱ्यापासून दूरवर आत न्याव्या लागत होत्या.

गेल्या नारळीपौर्णिमेला विशाल आणि त्याच्या मित्रमंडळींनीच काही गावकऱ्यांना समुद्र शांत करण्याच्या रूढीमागील फोलपणा पटवून दिला होता. पावसाळ्यात घडणारे भौगोलिक फेरफार कसे होतात, त्यामुळं समुद्राच्या लाटांवर तसेच भरती-ओहोटीत कसा बदल होतो, या विषयीची शास्त्रीय बैठकही समजावून दिली होती. आणि आपण विज्ञानाचं तंत्र स्वीकारलंय पण दृष्टिकोन नाही हेही ठसवण्यात त्यांना यश आलं होतं. त्यामुळं काही गावकऱ्यांनी नारळीपौर्णिमेच्या कार्यक्रमाला विरोधही केला होता. त्याऐवजी आधुनिक पद्धतीनं मासेमारीचं तंत्र कसं अवगत करावं हेही सांगण्याचा प्रयत्न केला होता.

दादल्याशेठला मुलांचं हे करणं अर्थातच अयोग्य वाटलं होतं. कारण जर सर्वसाधारण माणूसही आधुनिक तंत्रज्ञान वापरू लागला तर आपल्याला खोऱ्यानं पैसा ओढता येणार नाही. त्यासाठी गावकरी मागासलेलेच रहायला हवेत. अंधश्रद्धा आणि रूढी-परंपरेतून त्यांनी बाहेर पडणं दादल्याशेठच्या अनभिषिक्त सम्राटपदाला धक्का लावणारं होतं. गावकऱ्यांनी विचार करायला लागणं आणि जागृत होणं म्हणजे त्यांच्या सिंहासनाला पडणारं जबरदस्त खिंडार होतं. त्यांचं सत्तास्थान डळमळीत होणार होतं.

नारळीपौर्णिमेच्या दिवशी जरी त्यांनी पोरांना फारसा विरोध केला नाही तरी मनातून मात्र ते त्यांच्यावर संतापले होते. पण संतापून राजकारण करता येत नाही हेही ते जाणून होते. रूढी आणि परंपरांची थोरवी गाऊन त्यांनी गावकऱ्यांना कसंबसं समजावण्यात यश मिळवलं होतं. आणि तो कार्यक्रम थोड्याशा गोंधळातच पार पडला होता.

त्या दिवसांपासून ते ह्या पोरांवर नजर ठेवून होते. हेडमास्तरांनाही आडून आडून तर कधी धमकीवजा सूचना करून पाहिलं होतं. पण हेडमास्तर आपल्या विचारांशी पक्के होते. आणि मुख्य म्हणजे ते कोणत्याही प्रकारे शेठचे मिंधे नव्हते. विशालचं वागणं त्यांना त्या दिवशीही अयोग्य वाटलं नव्हतं. उलट, आपली शिकवण वाया गेली नाही ह्याबद्दल त्यांना स्वतःचाच अभिमान वाटत होता. विशाल लोकांमध्ये जागृती आणण्याचं, त्यांच्यात वैज्ञानिक दृष्टिकोन रुजवण्याचं कार्य करतोय हे पाहून त्यांना समाधान वाटत होतं. त्यामुळं ते दादल्याशेठच्या बोलण्याकडे फारसं लक्ष देत नव्हते.

दादल्याशेठ पोरांना वठणीवर आणण्यासाठी संधी शोधत होते. ती संधी ह्या माशांनी आणून दिली. त्या निमित्तानं देवीचा कोप भासवून त्यांनी पोरांविरुद्ध जनमत तयार करण्यात यश मिळवलं. आणि दुसरीकडे माशांची निर्यात करण्याचा बेत आखून एका दगडात दोन पक्षी मारले. स्वतःच्याच अक्कलहुशारीवर ते खूष झाले होते आज! सारा गाव त्यांच्या बाजूला होता.

आणि हाच पेच विशालच्या व त्याच्या मित्रांच्या पुढं पडला होता. ह्या गावाला समजवावं कसं? शेवटी विचार केल्यानंतर त्यांनी असं ठरवलं की, प्रथम हे जलप्रदूषणच आहे हे नक्की करायचं. नंतर ते कुठून होतं ते शोधून काढायचं. सगळे धागेदोरे आणि पुरावे हातात आल्यावर त्यांना वर्तमानपत्रातून प्रसिद्धी द्यायची. मग पाहू पुढं काय होतं ते.

विचार पक्का झाल्यानंतर ते तातडीनं कामाला लागले. कारण शांत करण्याच्या दिवसाच्या आधी पुरावे गोळा करणं आवश्यक होतं. सर्वात प्रथम त्यांनी पिशवीत भरून ठेवलेले मासे घेऊन जवळच्याच मत्स्यसंशोधन केंद्राकडे तपासणीसाठी एकाला पिटाळले. आणि त्याचा अहवाल तातडीने मिळणे कसे आवश्यक आहे हे त्या अधिकाऱ्याला पटवायला सांगितले.

नंतर त्यांनी खाडीकिनाऱ्यालगतच्या पाण्याने एक बाटली भरली. त्यावर एक लेबल लावले; ते पाणी कुठल्या भागातून घेतले आहे हे कळावे म्हणून. नंतर त्यांनी किनाऱ्यावरून चालण्यास सुरुवात केली. कारखान्याच्या सांडपाण्याच्या नाल्याच्या दिशेनं चालत असताना प्रत्येक अर्ध्या कि. मी. अंतरावर ते बाटली भरत होते. आणि तीवर लेबल लावत होते. शेवटची बाटली त्यांनी कारखान्याचा सांडपाण्याचा पाईप जिथे खाडीत बाहेर पडतो तिथं भरली. आणि ह्या सर्व बाटल्या घेऊन जिल्ह्याच्या गावी जलशुद्धीकरण केंद्राकडे निघाले.



एकदोघांना त्यांनी गावकऱ्यांमध्ये मत अजमावण्यासाठी गावातच रहाण्यास सांगितले. मागच्या वेळी त्यांना साथ देणारे गावकरी आज मात्र त्यांच्याशी असहमती दर्शवित होते. कदाचित त्यांना दादल्याशेठची भीती वाटत असावी. विशालच्या मित्रांनी त्यांना जलप्रदूषण म्हणजे काय ते समजावण्याचा प्रयत्न केला. पण ते काही ऐकायला तयार नव्हते. उलट, त्यांनाच सांगत होते की, दादल्याशेठशी वैर का विकत घेता म्हणून.

इकडे दादल्याशेठ वेगळाच विचार करीत होते. त्यांना अंदाज आला होता हे मासे कशामुळे मेले असावेत त्याचा. जरी त्यांनी माशांची विल्हेवाट त्यांच्या पद्धतीने लावली होती, तरी पुनःपुन्हा असे घडले तर एकूण कठीणच होतं. एकदोनदा आपली चोरी लपून जाईल. पण नेहमी घडायला लागलं तर वरपासून खालपर्यंत सगळ्यांनाच संशय येईल. मग कारखानाच काय, आपणही जिवंत राहू शकणार नाही याची त्यांना खात्री वाटत होती.

त्यांनी ताबडतोब कारखान्याच्या निवडक 'विश्वसनीय चार अधिकाऱ्यांना आमंत्रणं धाडली आणि आपल्या घरी बैठक बोलावली. सगळे जमल्यावर त्यांनी विषयाला सुरुवात केली. मुद्यालाच हात घालत ते म्हणाले, ''दोन दिवसांपूर्वीचा खाडीतील मासे मरण्याचा प्रसंग तुम्हाला माहीतच आहे. आपल्या कारखान्यातून आपण कुठल्याही प्रकारची प्रक्रिया न करता सांडपाणी खाडीत गेली दोन वर्षं सतत टाकतो आहोत. त्याचाच हा परिणाम असावा असं मला वाटतंय. तुमचं काय म्हणणं आहे?''

''मी तुम्हांला कारखाना उभारतानाच सांगितलं होतं की, असं सांडपाणी सरळ खाडीत सोडू नका म्हणून. त्यावर प्रक्रिया करण्याची यंत्रसामग्री बसवा म्हणून. पण खर्च फार होतो आणि त्या यंत्रसामग्रीतून कुठल्याही प्रकारचं उत्पादन न होता दुरुस्तीचा फक्त खर्चच होईल आणि काहीच फायदा मिळणार नाही म्हणून तुम्ही तिकडे दुर्लक्ष केलंत. त्याचाच परिणाम आहे हा.'' एक अधिकारी म्हणाला.

''त्यावर कमी खर्चाचा उपाय काय हेच ठरवण्यासाठी तर मी आजची बैठक बोलावली आहे, काय झालं त्यावर चर्चा करण्यासाठी नाही.'' शेठ जरा रागानंच म्हणाले.

''दुसरा उपाय आहे, ते पाणी खोल जमिनीत जिरवण्याचा. आणि ह्या उपायाला खर्चही कमी येईल.'' दुसरा अधिकारी म्हणाला.

''पण त्याचेही भयंकर दुष्परिणाम होतील भविष्यात. तेच पाणी झिरपून गावातील विहिरींत आणि शेतीत जाईल, शेतजमीन तर नापीक होईलच पण त्याबरोबर गावकऱ्यांवर अशा विहिरींतील पाणी प्यायल्यामुळे रोगराईची कुऱ्हाड कोसळेल ती वेगळीच.'' पुन्हा मगाचाच पहिला अधिकारी म्हणाला.

''तुम्हांला इथे मी सार्वजनिक आरोग्याचा अधिकारी म्हणून नोकरीला ठेवलेलं नाहीय. मला माझ्या कारखान्याची चिंता आहे. बाकीच्या माणसांचं काय होतं त्याच्याशी माझं देणंघेणं नाहीय. पुढं काही कुणाला संशय येण्याच्या आतच खाडीच्या तोंडावर उघडणारी पाइपांची तोंडं अशा सफाईनं बंद करा की, ते तिथं आहेत हे कळणारसुद्धा नाहीत. आणि ताबडतोब पाणी जमिनीत जिरवायच्या कामाचा आराखडा पक्का करून दोन दिवसांत ते काम दिवसरात्र मजूर लावून करून घ्या. पैशाची चिंता करू नका.'' दादल्याशेठनी जवळजवळ निर्णय दिल्यासारखी आज्ञा सोडली. अधिकारी न बोलता बाहेर पडले.

देवीची शांत करण्याचा उत्सव एका दिवसावर आला होता. दादल्याशेठच्या मनासारखं घडत होतं. पाइपांची तोंडं बंद करून तो पुरावाही नष्ट करण्यात आला होता. सांडपाणी प्रक्रिया करून बाहेर फेकण्याची भंगार मधून अगदी स्वस्तातील यंत्रसामग्री लोकांच्या डोळ्यावर धूळ फेकण्यासाठी आणून बसवली होती. सारं कसं आलबेल होतं. देवीचा कोप म्हणून गावकरी उत्सवाची तयारी करण्यात मग्न होते.

असं सगळं सुरळीत चाललं असतांना त्या दिवशी गावात अचानक खळबळ उडाली. दादल्याशेठवर प्रत्येकजण खवळला होता. तो माणूस आहे की राक्षस असा प्रत्येक जण खालच्या आवाजात विचारत होता. कारण त्याचं राक्षसपण कळलं तरी त्याच्याविरुद्ध आवाज काढायची कोणाची हिम्मत नव्हती. दादल्याशेठचे पोसलेले गुंडही गावातून फिरत होते. नेमकं झालं होतं तरी काय?

त्या दिवशीच्या वर्तमानपत्रांत ठळक मथळ्यांत 'खाडीकिनारी मासे मरण्याच्या घटनेमागे दादल्याशेठचा हात' अशी बातमी आली होती – अगदी पहिल्या पानावर. बातमीतील मजकूर असा होता –



'आठ दिवसांपूर्वी वावंढळ गावच्या खाडीकिनारी अचानक हजारोंच्या संख्येनं मासे मरून पडले होते. जणू काही ती त्यांची सामूहिक आत्महत्याच होती. या विपरीत घटनेचे कारण देवीचा कोप झालाय असे गावकऱ्यांना वाटले. त्यासाठी उद्या त्या गावात मोठा उत्सव केला जाणार आहे असे कळते.

''पण खरी गोष्ट वेगळीच आहे. त्याच गावच्या विशाल नावाच्या तरुणाने आमच्या वार्ताहरांपुढे काही ठोस पुरावे सादर करून, हा प्रताप दादल्याशेठच्या कारखान्यातून बाहेर पडणाऱ्या रासायनिक सांडपाण्याचा आहे असे सिद्ध केले आहे. ह्या सांडपाण्यात रासायनिक द्रव्य एवढे जास्त आहे की, त्याला पाणी का म्हणावे हा प्रश्नच आहे, असा निर्वाळा जलशुद्धीकरण केंद्राने दिला आहे. तसेच माशातील रासायनिक द्रव्ये आणि या तथाकथित पाण्यातील द्रव्ये सारखीच आढळून आली आहेत. यावरून हे मासे दादल्याशेठच्या कारखान्यातून बाहेर पडणाऱ्या सांडपाण्यामुळेच मेले आहेत हे सिद्ध होते. अशा या दादल्याशेठला लोकांच्या जीवितावर गंडांतर आणण्याचा कोणताही अधिकार नाही. स्वतःच्या वैयक्तिक स्वार्थासाठी आणि धनलोभापायी पर्यावरणाचे संतुलन बिघडविण्याचा कोणताही अधिकार नाही. शासनाने ह्या प्रकरणात लक्ष घालून त्वरित कारवाई करावी. अन्यथा लोकांचे प्राण घेण्यासही हा शेठ मागेपुढे पहाणार नाही.''

दादल्याशेठ ती बातमी वाचून जेवढे खवळले नव्हते, तेवढे त्या वर्तमानपत्रातील सांडपाण्याच्या पाइपातून सांडपाणी खाडीत सोडले जातेय हे दाखविणारा फोटो पाहून खवळले. विशाल आणि त्याच्या टोळक्यानेच हा उपद्व्याप केला आहे हे तर त्या बातमीवरून स्पष्टच होत होते. आता काय करावं या विचारात ते घरात येराझारा घालू लागले.

गावात मात्र विशाल आणि त्याची मित्रमंडळी वर्तमानपत्र हातांत घेऊन घराघरातून बोंब उठवत होते. आणि गावकऱ्यांना एकत्र यायला सांगत होते. ठिणगी पेटलीच होती, फक्त बत्ती लावायचीच काय ती बाकी होती. विशाल आणि त्याचे मित्र आता ते काम करायला सिद्ध झाले होते.

गावकरी चौकात एकत्र आल्यावर विशाल हातातील वर्तमानपत्र फडफडवत जोराने म्हणाला, ''पाहिलंत गावकरीहो, देवीचा कोप म्हणून तुम्हाआम्हांला कसे फसवत होते हे शेठ? स्वतःच्या काळ्या करणीवर

पांघरूण घालण्यासाठी तुमच्या अंधश्रद्धेचा ते असा फायदा घेऊ पहात होते. त्यांच्या पापांचा घडा आता भरलाय.

मला तर असंही कळलंय की, गावात दुर्गंधी नको, रोगराई नको म्हणून त्यांनी ट्रक लावून गोळा केलेले मासे परदेशी निर्यात करण्याचा घाट घातलाय. त्यातील पहिला हप्ता तर कालच रवाना झालाय. ते मासे खाऊन त्यांतील रासायनिक विषामुळे माणसं मेली तरी आपल्या या 'उदार' शेठना त्याची चिंता नाहीय. त्यांना दिसतोय तो फक्त पैसा आणि पैशानं सारं काही विकत घेता येतं हे तत्त्वज्ञान.

दूरच्या लोकांचं सोडाच पण आपल्या गावकऱ्यांविषयीही ते बेफिकीर आहेत. आता त्यांनी सांडपाण्याचे पाइप बेमालूमपणे बुजवून जमिनीत ते पाणी जिरवण्याचं तंत्र वापरलंय. एकंदरीत हुशार माणूस आहे!" विशालच्या प्रत्येक घणाघाती वाक्याचा गावकऱ्यांवर परिणाम होत होता. थोडं थांबून तो पुन्हा बोलायला लागला, "जमिनीत पाणी जिरवल्यामुळं आपली शेतजमीन भविष्यात नापीक होईल, त्याचं काय? आणि झिरपत झिरपत ते पाणी विहिरीत आलं तर तुम्हीआम्ही जिवंत राहू?"

हे ऐकून तर गावकरी एकदम खवळलेच. आपल्याच जीवावर उठलेल्या ह्या माणसाला जिवंत ठेवता कामा नये, अशी कुजबूज सुरू झाली. थोड्याच वेळात ह्या कुजबुजीचं गलक्यात रूपांतर झालं. काही तापट मंडळींनी हातांत दगडधोंडे जे मिळेल ते घेऊन दादल्याशेठच्या घराकडं धावायला सुरुवात केली. विशाल त्यांना "थांबा, थांबा, घायकुतीला येऊ नका" म्हणून ओरडून समजावयाचा प्रयत्न करीत होता. पण गावकऱ्यांचा जमाव भडकला होता. एकाचं पाहून दुसरा असं करत करत सगळे गावकरी दगड-धोंडे घेऊन दादल्याशेठच्या घराकडे पळायला लागले.

अचानक दादल्याशेठच्या घरावर दगडांचा मारा होऊ लागला. गावकऱ्यांचा जमाव "दादल्याशेठ मुर्दाबाद" करीत घराजवळ दगडधोंडे भिरकावत आलेला पाहून मुख्य दरवाजावरील रक्षक जीव मुठीत घेऊन घरात पळाला. दोनचार दगड पडल्यावर दादल्याशेठलाही परिस्थितीची कल्पना आली. बाहेरचं दार बंद करून तो आतल्या घरात जाऊन मागच्या मागे पळण्याच्या विचारात होता. पण गावकऱ्यांनी घराला चारही बाजूंनी वेढा दिला होता. आता आपली धडगत नाही हे दादल्याशेठला कळून चुकले. काय करावं ते त्याला सुचेना.



इतक्यात विशाल आणि त्याचे मित्र धापा टाकत दादल्याशेठच्या घराजवळ आले. जोरजोराने ओरडत जमावाला शांत करण्याचा प्रयत्न करू लागले. हळूहळू जमाव शांत झाला. विशाल पुन्हा खणखणीत आवाजात बोलू लागला,

"गावकरीहो, दादल्याशेठ कितीही राक्षसी वृत्तीचा असला तरी कायदा हातात घेणं हे आपल्यासारख्या माणसांचं काम नाही. मी पोलिसांना फोन केलाय. एवढ्यात ते येतीलच. जाबजबान्या होऊन आणि योग्य ते साक्षीपुरावे देऊन आपण त्यांना कडक शिक्षा कशी होईल ते पाहू. पण दादल्याशेठला मारण्याचा विचार करू नका. एकाने गाय मारली म्हणून दुसऱ्यानं वासरू मारलं पाहिजेच असं थोडंच आहे. त्यांना त्यांच्या काळ्या कर्माचं फळ मिळालंच पाहिजे. पण ते द्यायला कायदा समर्थ आहे. माणूस चुका करतो, पण त्याच्या सद्सद्विवेक बुद्धीला जर का उमगलं तर त्याचं तो प्रायश्चित्त घ्यायलाही तयार होतो. तशी एक संधी आपण दादल्याशेठना देऊ या. त्यांना बाहेर बोलावून जाहीर माफी मागायला लावूया. पुन्हा असं दुर्वर्तन करणार नाही अशी लेखी हमी घेऊया. गैरव्यवहार न करता गावकऱ्यांशी सलोख्यानं वागायला सांगूया. ते जर सरळपणानं आपल्यात राहिले तर त्यांचा पैसा आणि आपले श्रम यांनी आपण गावाचं नंदनवन करू शकू. तेव्हा त्यांना एक संधी देऊ या. पटतंय ना तुम्हाला?"

विशालनं एवढं बोलून गावकऱ्यांवर एक दृष्टिक्षेप टाकला. समुदायातनं एकच आरोळी उठली, 'माफी मागा, माफी मागा.'

विशाल मग दादल्याशेठच्या घरात गेला. दारावर थाप मारून शेठना म्हणाला, "शेठ, घाबरू नका. बाहेर येऊन जाहीर माफी मागा. असं पुन्हा करणार नाही असं जाहीर करा, सलोख्यानं वागेन म्हणून वचन द्या. गावकरी तुमची वाट पहात आहेत."

विशालच्या भरोशावर घाबरत घाबरत त्यांनी दार उघडून किलकिलं केलं. आणि हळूच बाहेर डोकावलं. त्यांचा उतरलेला आणि घाबरलेला चेहरा पाहून गावकऱ्यांना चेव आला, 'दादल्याशेठ मुर्दाबाद' च्या घोषणा उठल्या. विशालनं हात वर करून त्यांना शांत केलं. त्याच्या दोन मित्रांना खुणेनं बोलावून व दादल्याशेठला विश्वास दाखवून बाहेर आणलं. ते त्यांच्याबरोबर थरथरत अंगणात आले. पुन्हा एकदा मुर्दाबादची घोषणा

झाली. विशालनं त्यांना शांत रहायला सांगितलं आणि दादल्याशेठना म्हणाला, "माफी मागा."

दादल्याशेठचे ओठ थरथरायला लागले. अंगात हुडहुडी भरली होती. एखाद्या गावकऱ्यानं आगळीक केली तरी त्यांचा जीव जायला वेळ लागणार नव्हता. प्रचंड घाबरून गेले होते ते!

"गावकरी बंधूनो, म . . . मला एकवार माफी करा. मी पुन्हा नाही असा वागणार. ह्या विशालनं माझे डोळे उघडले. त्याचा मी उतराई कसा होऊ तेच मला कळत नाहीय. यापुढचं आयुष्य मी सगळ्यांना विनामोबदला कुठलाही स्वार्थी विचार मनात न आणता मदत करण्यात घालवीन असं मी जाहीर वचन देतो. फक्त एकदाच मला जीवदान द्या. मी हात जोडून विनंती करतो, हवं तर पाया पडतो." असं म्हणत त्यांनी समुदायापुढं सपशेल लोटांगण घातलं. आणि हमसाहमशी रडू लागले.

इतक्यात पोलिसांचा फौजफाटा आला. दादल्याशेठनं आपणहून हात पुढे केला आणि हातकड्या बांधून घेतल्या. आणि पोलिसांना म्हणाले, "मला केलेल्या चुकीचं प्रायश्चित्त भोगायचंय तेव्हा जास्तीत जास्त शिक्षा द्या." नंतर जाता जाता गावकऱ्यांना उद्देशून म्हणाले, "या विशालची मदत घेऊन कारखान्याचा सांभाळ करा. आजपासून या कारखान्याचं व्यवस्थापन कामगारच करतील. मी हा कारखाना गावाला देणगी म्हणून देत आहे. आणि त्याचा विश्वस्त राहील – विशाल. तो आपल्या गावचा भूषण आहे.

गावकऱ्यांनी विशालच्या नावाचा जयघोष केला. आणि आपापल्या घरी पांगले. विशाल मात्र आपल्या हाती आलेल्या कारखान्याच्या सांडपाण्याचा निचरा कसा करायचा या विचारात गढून गेला होता.

❋ ❋ ❋

## दहा पैशांचं नाणं

"अरे गणपा, लवकर धावत इकडे ये. गावाच्या वेशीवर बघ गर्दी झालीय." रमेश कुजबुजला.

"काय रे, काय झालं गर्दी जमायला? अन् तू एवढा धापा टाकत काय आलायस?"

"गावकुसावर एक बाबा आलाय. काय त्याचं तेज! काय त्याची चर्या!! काय त्याचं बोलणं!!! आपण तर बुवा दिपूनच गेलो त्याला बघून. काय रसाळ वाणीनं बोलतो तो. गावची सगळी बडी बडी मंडळी जमलीयत. चल, येतोस का तू बघायला?"

"थांब थोडा. मी आता कामात आहे. थोड्या वेळाने जाऊ."

"अरे, तू वेडा की खुळा! तुझं काम नंतर केलं तर फारसं बिघडणार नाहीय. तो बाबा निघून गेला तर मात्र तुझं भलतंच नुकसान होईल. त्याच्याकडं दैवी शक्ती आहे. तो चमत्कारही करून दाखवतो म्हणे! त्याची तुझ्यावर कृपा झाली तर तो तुझी सर्व दुःखं एका झटक्यात नाहीशी करून टाकील बघ."

चमत्काराचं ऐकल्याबरोबर गणपाला रहावेना. त्यानं तडक आपलं काम बाजूला सारलं अन् तो निघाला रमेशबरोबर बाबाकडं. जाता जाता त्यांच्या चमत्कार आणि बाबांविषयीच गप्पा चालल्या होत्या. कोणकोण जमलंय, काय करताहेत इ. माहिती गणपा रमेशला विचारत होता. होता होता ते गावकुसाजवळ आले.

गावकुसावर असलेल्या म्हसोबाच्या देवळाच्या अंगणात गर्दी जमलेली दिसत होती. जवळ गेल्यावर त्यांच्या लक्षात आलं की, आपण घाईघाईत हार व नारळ घ्यायला विसरलोय. पण आता परत जाऊन येण्यात वेळ होणार ह्योता. ते तसेच पुढे झाले. त्यांना दिसलं की, गावचे पाटील, बडे बडे व्यापारी, गावच्या मुख्य देवळाचे पुजारी इ. मंडळी जमली आहेत. धुपाचा वास दरवळतोय. बाबाला सगळे नमस्कार, नव्हे लोटांगणं घालताहेत. हळूहळू आवाजात आपले प्रश्न, आपल्या चिंता त्यांना सांगितल्या जात आहेत. बाबा धीरगंभीर मुद्रा करून, ध्यानस्थ योग्याप्रमाणे बसले आहेत. ह्या सर्व वातावरणाचा त्यांच्यावर परिणाम न झाला तरच नवल.

गणपा धावतच बाबांजवळ गेला अन् त्याने त्यांना साष्टांग नमस्कार घातला. त्यांचे पाय चुरू लागला. तो बाबांना सद्‌गदित स्वरात म्हणाला,

"बाबा, माझ्यावर कृपा करा. मी मोठ्या संकटात आहे. माझ्या मुलीचं लग्नच होत नाहीय. माझे जोडे झिजून झिजून पाय मोडायची पाळी आली आहे."

बाबांनी त्याला हळुवारपणे उठवलं. त्याच्याकडे नजर रोखून पाहू लागले. त्यांची ती भेदक नजर पाहून आपोआपच गणपा खाली पाहू लागला. त्यांच्या नजरेला नजर देणं त्याला जमलंच नाही. त्यामुळे तो आणखीनच भारावला. बाबांनी त्याच्या डोक्यावर हात ठेवला. 'तथास्तु' केल्याप्रमाणे. गणपाला बरं वाटलं. बाबांची आपल्यावर कृपा झाली म्हणून तो समाधानी झाला.

"बालका, तुझ्याकडे दहा पैसे मिळतील?" बाबांनी हळुवार पण भरदार आवाजात विनंतीवजा आज्ञा करीत विचारलं.

गणपाने पटकन आठ आण्यांचं नाणं काढून दिलं.

ते पाहून बाबा जरबेच्या आवाजात म्हणाले,

"बालका, मी फक्त दहा पैशांचंच नाणं मागितलं, तर तू मला आठ आणे देऊ करतोस. मी काय भीक मागितली होय?"

त्यांचं बोलणं ऐकून गणपा भांबावला. त्याला काय करावं ते सुचेना. आजूबाजूची मंडळीही हा काय उद्धट आहे अशा नजरेने त्याच्याकडे पाहू लागली. ते पाहून तो आणखीनच संकोचला.

त्याची ही अवस्था पाहून बाबा हळुवार आवाजात मार्दवाने म्हणाले, "बालका, मी गरिबांची सेवा करण्याचं व्रत घेतलं आहे. गोरगरिबांना लुटण्याचं नाही. आज तुम्ही मला आठ आणे द्याल, उद्या रुपया, परवा आणखी काही. पण तुमच्याकडचं धन मला नकोय. गरिबांची सेवा हीच माझी ईश्वराचरणी सेवा आहे."

त्यांचं हे वक्तव्य ऐकून गावकरी त्यांच्याकडे आणखीनच आदराने पाहू लागले. आपल्या गावचं भाग्य मोठं म्हणूनच हे बाबा आपल्या गावात आले आहेत अशी त्यांची भावना झाली. पाटलांनी तात्काळ त्यांच्या जवळील दहा पैशांचं नाणं बाबांना देऊ केलं पण त्यांनी ते नाकारलं. त्यांना गणपाजवळूनच ते नाणं हवं होतं. त्यांच्या इच्छेला मान देऊन गणपाने त्यांना दहा पैशांचं नाणं दिलं.



क्षण दोन क्षण बाबा ध्यानस्थ बसले. हातातील नाण्यावर फुंकर मारून काही मंत्र पुटपुटले. मग गणपाच्या हातात नाणं देत म्हणाले, "हे नाणं थोडा वेळ मुठीत बंद करून ठेव. मी सांगेन तेव्हा मूठ उघड."

थोड्या काळाने बाबांनी त्याला मूठ उघडायला लावली. अन् तो हाताकडे अचंब्याने पहातच राहिला. बाबांच्या पायावर पडून रडू लागला. गावकऱ्यांना कळेना, हा एकदम असं का करतोय ते.

"बाबा, तुम्ही माझ्यावर कृपा केलीत. मी धन्य झालो. माझं आयुष्य सार्थकी लागलं." रडत रडत गणपा म्हणत होता, "बाबा, आता मी तुमच्या

सेवेत रहाणार. मला सोडून जाऊ नका. माझ्या घरी या. तिथं तुमची चांगली व्यवस्था ठेवीन."

"बालका, अरे, मी संन्यासी माणूस. मला ह्या मोहमायेचा स्पर्शही नकोय. मी आपला इथेच बरा आहे. ठेविले अनंते तैसेचि रहावे! ही शिकवण लक्षात ठेव."

गावकऱ्यांमध्ये अजूनही कुतूहल होते. ते गणपाच्या हाताकडे पहाण्यासाठी धडपडू लागले. गणपाने सर्वांना आनंदाने हात दाखवत सांगितले,

"पहा, पहा बाबांची सिद्धी! ह्या नाण्यातून भारंभार विभूती येत आहे. ही विभूतीच आता माझं रक्षण करील."

धडाधड गावकऱ्यांनी बाबांना लोटांगण घालायला सुरवात केली. हां हां म्हणता बाबांच्या चमत्कारांची, सिद्धीची वार्ता सर्व पंचक्रोशीत पसरली. पहाता पहाता राममंदिरात एक मोठा मठ स्थापन झाला. गावची अवकळा नाहीशी होऊन, नेतेमंडळीही बाबांची सेवा करायला हजर होऊ लागली. बाबांची आपल्यावर कृपा व्हावी म्हणून बाबांना सुख-स्वास्थ्य देण्यासाठी सर्व काही देण्याची लोकांमध्ये अहमहमिका लागू लागली. बाबांच्या मठाचा बोलबाला दिवसेंदिवस वाढू-पसरू लागला. अधूनमधून मंत्रीही येऊ लागले. एवढंच नव्हे तर जिल्ह्याचे कलेक्टर, पोलीस इन्स्पेक्टर, डॉक्टर मंडळीही आपलं जाणं-येणं वाढवू लागली. प्रत्येकाच्या समस्यांचं बाबा निवारण करत होते.

काही लोकांच्या समस्या सुटण्याऐवजी वाढल्याच होत्या. पण त्या लोकांना वाटत होतं की, आपण मागच्या जन्मी भरपूर पाप केलंय म्हणून ह्या जन्मी हे भोग भोगलेच पाहिजेत. त्याला बाबा तरी काय करणार? कारण बाबांच्या कृपाप्रसादामुळे निपुत्रिक स्त्रियांनाही मुलं झाली होती. काही लोकांच्या मुलाबाळांना नोकऱ्याही बाबांमुळेच मिळाल्या होत्या. तर काहींचे धंदेही जोरात चालू लागले होते. हे सर्वांना दिसलं होतं. म्हणून समस्या न सुटलेली मंडळीही पुनःपुन्हा बाबांकडे जात होती.

एक दिवस अचानक गावात बातमी पसरली : बाबांच्या मठात राघूशेठची तरणीबांड गोरीगोमटी नात मेलेली सापडली. गावात खळबळ माजली. पण बाबांनी आपल्या 'सिद्धी'च्या जोरावर सारं प्रकरण दाबून टाकलं. पुन्हा सारं काही आलबेल झालं.



पण ह्या प्रकरणानंतर गावातील काही शिकलेल्या तरुण मंडळींना बाबांच्या मठाबाबत शंका येऊ लागली. ते गावकऱ्यांना आपली शंका सांगण्याचा प्रयत्न करू लागले. गावकरी मात्र त्यांना वेड्यात काढत होते. "उगंच चार बुकं शिकली म्हणजे जादा अक्कल आली, असं होतं काय?" असे प्रश्न विचारून गावकरी त्या तरुणांना निरुत्तर करीत होते. एवढी मोठी मंडळी बाबांच्या भजनी असताना त्यांच्या विरोधात जाणं हे तरुणांनाही आव्हान होतं. ते आपापसांत कुजबूजत होते पण उपाय सापडत नव्हता. बाबांच्या खोटेपणाविषयीची माहिती त्यांच्याकडे पुराव्यानिशी जमत होती. पण उघडपणे त्यांच्या विरुद्ध ते काहीच करू शकत नव्हते. पोलिसांकडे जाणं हा मूर्खपणाच ठरला असता. कारण खुद्द पोलीस-इन्स्पेक्टरच बाबांच्या मर्जीतले होते. त्यांनीच ह्या पोरांना बंद करून टाकलं असतं. पोरं मात्र गावकरी फसवले जात आहेत म्हणून दिवसागणिक अस्वस्थ होत होती.

काही महिने असेच गेले. शिवरात्र आली. शिवमंदिरात गावची जत्रा भरली. दिवस संपता संपता गावात बोंब उठली : हिमालयात बारा वर्षं तपश्चर्या करून आलेले बाबा महानंद गावात आले आहेत. गावच्या भव्य पटांगणात ते आसनस्थ झाले आहेत. सारा गाव त्यांना पहाण्यासाठी आपापल्या घरादारांतून बाहेर पडला.

जवळपास सारा गाव जमलेला पाहून बाबा महानंदाच्या शिष्याने बोलायला सुरुवात केली :

"सज्जनहो, आपल्या गावाचं भाग्य थोर, म्हणूनच आज शिवरात्रीच्या दिवशी बाबा महानंदांचा पदस्पर्श आपल्या गावात झाला आहे. हिमालयात तपश्चर्या करून बाबांनी अनेक मंत्र व सिद्धी प्राप्त केल्या आहेत."

शिष्याचं बोलणं चालू असतानाच गावातील पूर्वीचे बाबा तिथं अवतीर्ण झाले. त्यांनी एकंदर परिस्थिती न्याहाळली. त्यांना कळून चुकलं की जर ह्या नव्या बाबांचं बस्तान बसलं तर आपली काही धडगत नाही. ह्याला कसंही करून पिटाळलं पाहिजे.

थोडासा विचार केला अन् गावातल्या बड्या मंडळींची साथ पाहून त्यांनी ह्या नव्या बाबांना आव्हान दिलं.

ते जोरात ओरडून म्हणाले, "अरे, तपश्चर्येच्या गोष्टी करतोस . . . तू मंत्रसिद्धीच्या गोष्टी करतोस, तर मग मला जी सिद्धी प्राप्त आहे, ती करून दाखव."

महानंद बाबा गालातल्या गालात हसले. त्यांच्या शिष्याने ती खूण ओळखून लगेच गावकऱ्यांना सांगितलं, "तुमच्यापैकी कुणीही मला दहा पैशांचं नाणं द्या. आमचे बाबा त्यांतून विभूती काढून दाखवतील."

गावकरी जरा चक्रावलेच. ह्या बाबांनी मंत्रसिद्धी न सांगताही ती कोणती असेल हे महानंदानी कसे काय ओळखले बरं, असा प्रश्नही त्यांना पडला. बाबा महानंदाच्या अंतर्ज्ञानावर काही गावकरी खूषही झाले. त्यांना वाटू लागलं की, हे बाबा आपल्या जुन्या बाबांपेक्षाही मोठे असले पाहिजेत. ताबडतोब एका गावकऱ्याने दहा पैशांचं नाणं त्या शिष्याला दिलं. शिष्याने ते नाणं पाण्यात पवित्र करून बाबांच्या हाती दिलं. बाबांनी मंत्र पुटपुटला आणि नाणं शिष्याच्या हाती परत सोपवलं. शिष्याने ते नाणं त्या गावकऱ्यांच्या हाती दिलं. गावकऱ्यांनी पाहिलं तर खरंच त्या नाण्यातून विभूती येत होती. गावकरी महानंदांवर खूष झाले. ते आपापसांत उलटसुलट चर्चा करू लागले. तेवढ्यात त्यांना शिष्याचा आवाज पुन्हा ऐकू आला

"भक्तगणहो, हा चमत्कार तर काहीच नाही. ह्यापेक्षा वरचढ चमत्कार बाबा तुम्हांला करून दाखवणार आहेत."

मग बाबांनी मंत्राग्नी पेटवणं, आग खाणं, शरीरातून सुया आरपार खुपसणं, नोट जाळून पुन्हा त्याच नंबरची नोट निर्माण करणं, रिकाम्या हातातून शिवलिंग काढणं, तांदळांनी भरलेला लोटा अधांतरी तरंगवणं असे अनेक चमत्कार करून दाखवले. सारे गावकरी प्रत्येक चमत्कार मंत्रमुग्ध होऊन पहात होते.

गावकरी आपल्या कह्यात आलेले पाहून महानंदांच्या शिष्याने आता जुन्या बाबाला आव्हान दिलं, की त्याने हे सर्व चमत्कार करून दाखवावेत. त्यावर गावकऱ्यांनीही त्यांना आग्रह करण्यासाठी त्यांच्याकडे पाहिलं, तो बाबा त्या गर्दीत नव्हतेच. ते केव्हाच ह्या गडबडीत पसार झाले होते. काही गावकरी त्यांना त्यांच्या मठात शोधण्यासाठी गेले. पण मठही पूर्णपणे रिकामा झाला होता. सगळी चिजवस्तू घेऊन बाबा पळून गेले होते.



गावकरी पुन्हा पटांगणात आले. आणि सारी हकीकत महानंदांच्या शिष्यांना ऐकवली.

गावकऱ्यांना समजवण्याची हीच संधी आहे, हे पाहून महानंदबाबांनी आपल्या डोक्यावरील केसांचा टोप उतरवला.

"अरे, हा तर पाटलाचा मुलगा. ह्याने आपल्याला बनवलं की."

गावकऱ्यांनी एकच गिल्ला करायला सुरवात केली. ताबडतोब खड्या आवाजात त्याने सर्वांना शांत रहाण्यास सांगितलं.

"गावकरीहो, मी बाबांचा वेश घेऊन तुम्हांला फसवलं, त्याबद्दल प्रथम तुमची माफी मागतो. पण ह्या खोट्या बाबाला गावातून पळवून लावण्यासाठी आमच्याकडे दुसरा कुठलाच उपाय नव्हता. तुम्हांला सरळ सरळ सांगून पटलंही नसतं. पण ह्या बाबाच्या अनेक काळ्या कहाण्या आमच्याकडे पुराव्यांनिशी उपलब्ध आहेत. ह्यांत गावची बडी बडी मंडळी गुंतली आहेत. त्यांचे अनेक हितसंबंध गुंतले आहेत. पण आम्ही त्यांना दोष देत नाही. आयुष्यातील सुखाचा 'शॉर्टकट' शोधण्याच्या नादात ते फसले. पण त्यांना खोट्या प्रतिष्ठेच्या दबावामुळे उघडपणेही बोलता येत नव्हतं. ह्या बाबाने आपल्या गावची धनदौलत एवढंच नव्हे तर मुलं देतो ह्या नावाखाली आपल्या आयाबहिणींनाही लुटलं. हे सगळं कसं मोठ्यांच्या पाठिंब्यामुळे बिनबोभाट चाललं होतं. आम्हांला मात्र गावची ही अधोगती बघवेना. म्हणूनच योग्य संधीची आम्ही वाट पहात होतो. त्यासाठीच हे सोंग घेणं भाग पडलं."

"आरं, ती विभूती कशी काय काढली ते सांग की." गर्दीतून एक आवाज आला.

"काही विशेष नाही. मी हातांना एक विशिष्ट रसायन लावलं होतं. त्याची फक्त ॲल्युमिनियमवरच क्रिया होते. म्हणूनच मी दहा पैशांचं नाणं मागितलं."

"आरं तिच्या, म्हणूनच त्यो बाबा गणपाकडून त्या द्दिवशी आठ आण्याचं नाणं घ्यायला तयार नव्हता. अन् म्हणे मी गरिबांचा बाबा. वा रं वा!" गर्दीतून एक आवाज घुमला.

* * *



# जेव्हा घड्याळ बोलूं लागते

अनुराधा, तनुजा, रूपाली आणि विशाल ही चारही भावंडे आज बोरीवलीच्या नॅशनल पार्कमध्ये फिरावयास आली होती. त्यांची नुकतीच सहामाही परीक्षा आटोपली होती. म्हणून सर्वजण अगदी आनंदात होते. परीक्षेचा थकवा घालवण्यासाठीच ते आजे बाहेर पडले होते. पूर्ण दिवस मजेत घालवायचा या उद्देशानं त्यांची भटकंती चालू होती.

"ए अनुराधाताई पहिल्या प्रथम आपण वाघांच्या सफारीत जाऊ या ना? त्या बसमध्ये बसून अगदी जवळून वाघ पहायला मिळतील." विशालनं पार्कमध्ये प्रवेश करताकरताच सूचना मांडली.



"आणि नंतर आपण त्या तलावातल्या बोटीतून एक चक्कर मारायची हं." तनुजानं आपलीही पुस्ती जोडली.

"बरं बाबांनो, होऊ दे तुमच्या मनासारखं." असं म्हणत अनुराधाने पोक्तपणाचा आव आणला. नाहीतरी अनुराधा त्या सर्वांच्यात मोठी होती.

वाघाची सफारी आणि तलावातील फेरफटका आटोपल्यावर त्यांनी जवळच्याच उपहारगृहात उत्तपा, डोसा, आम्लेट, एनर्जी, इ. पदार्थांवर यथेच्छ ताव मारला.

"आता कुठं जायचं?" पोट भरल्यानंतर रूपालीनं विचारलं.

"आपण गांधीस्मारकावर जाऊया. तेवढंच टेकडी चढताना हायकिंग होईल." विशाल म्हणाला.

"ओ. के. चला." अनुराधा म्हणाली.

सरळ वाटेनं काय जायचं म्हणून, विशालनं त्या तिघींना गांधी-स्मारकाची टेकडी आडवाटेनं चढण्यास भाग पाडलं. त्या वाटेवर झाडंही खूप होती आणि गवतही पुरुषभर उंचीचं होतं.

"ए, मला बाई भीतीच वाटते. त्यापेक्षा आपण आपल्या सरळ वाटेनं. . .नीट रस्त्यानंच जाऊ." रूपालीनं रडव्या सुरात विशालला विनवलं.

पण ऐकेल तो विशाल कसला!

"ॲहॅरे भित्री भागूबाई. आम्ही सगळे बरोबर आहोत नं. मग का घाबरतेस?" असं म्हणून त्यानं तिला आणखीन गर्द झाडीच्या वाटेनं न्यायला सुरवात केली. त्या धडपडीत रूपालीच्या अंगावर काट्यांचे ओरखडे पडले आणि ती आणखीनच घाबरली. शेवटी अनुराधानं विशालला दटावलं, "अरे, असा छळू नकोस रे तिला." आणि रूपालीला आपल्या सोबत यायला सांगितलं.

त्या आडवाटेनं सावकाशपणे ते चालत होते. नंतर थोडासा उतार लागला.

"आता नदी क्रॉस केली की झालं. सरळ टेकडीच्याच मार्गाला लागू." असं म्हणत विशाल धावू लागला. पहाता पहाता तो पलीकडच्या किनाऱ्यावर पोहोचलासुद्धा. त्याच्या मागोमाग तनुजाही धावायला लागली होती. नदीला पाणी तसं नव्हतंच. पण दगडगोटे चिक्कार होते.

त्यांना धावताना पाहून अनुराधा ओरडलीच, "अरे, सांभाळून पळा रेऽ, पाण्यामुळे दगड निसरडे झाले असतील."

ती एवढं बोलतेय न बोलतेय तोच तनुजा धडपडली आणि धाड्दिशी खाली पडली.

"कशी मज्जा आली एकीची!" असं म्हणत विशाल तिला चिडवायला लागला. तनुजानं एकदम भोकांडच पसरलं. अनुराधानं धावत जाऊन तिला सावरलं. विशाल मात्र चिडवण्याच्या नादात तिच्याकडे नुसता पहात उभा होता.

"विशाल, अरे तुला काही कळतं की नाही? ती बिचारी एवढी पडलीय, हातापायाला खरचटलंय. तिला सावरायचं सोडून टाळ्या पिटीत मज्जा बघत बसलायस! तू तिचा मोठा भाऊ ना? शोभतं का तुला हे?" अनुराधानं विशालला झापलं.

तो पटकन् गप्प बसला. अनुराधानं तनुजाच्या अंगावरील माती झटकली. ढोपराला आणि कोपराला आलेलं रक्त रुमालानं पुसलं अन् म्हणाली, "आता नीट चला बरं का. परत परत पडायला नको. आणि दंगामस्ती केली तर सरळ घरी घेऊन जाईन.

खरं तर अनुराधा त्यांच्यापेक्षा वयानं फार मोठी होती असं नाही. सगळ्यांची वयं बारा-पंधरा वर्षांच्या आतलीच. पण अनुराधाला वयाच्या मानानं समज चांगली होती. विशाल खोडकर पण चौकस होता. तनुजा थोडीफार विशालसारखीच होती. रूपाली मात्र जरा घाबरटच होती. त्यामुळं तनुजा आणि विशाल तिला सतत चिडवायचे. आणि ती मुळूमुळू रडत बसायची.

तनुजा ठिकठाक होऊन चालायला लागणार एवढ्यात विशालला तिच्या पायाखाली एक चमकणारी वस्तू दिसली आणि तो ओरडला, "तनुजा, बघ तुझ्या पायाखाली काय आहे?"

तिला वाटलं, सापबीप आला की काय? म्हणून ती घाबरून पळायला लागली. अन् परत धडपडली. अनुराधानं तिला कसंबसं सावरलं. विशावर ती खेकसणार इतक्यात विशालनंच तिला हाक मारली,

"अगं ताई, हे बघ घड्याळ दिसतंय."

घड्याळ म्हटल्याबरोबर सगळे जण त्याच्याभोवती गोळा झाले आणि त्या घड्याळाचं निरीक्षण करू लागले.



'बघू बघू' म्हणून तनुजानं ते घड्याळ विशालच्या हातातून हिसकावलं. त्यात ते पुन्हा खाली पडलं.

"अगं, असं हिसकावतेस काय? बघ, खाली पडलं ना." असं म्हणत त्याने ते पुन्हा हातात घेतलं.

घड्याळ बंद पडलेलं होतं. पण ते नेहमीच्या घड्याळापेक्षा वेगळं दिसत होतं. त्याची जाडीही इतर नेहमीच्या मनगटी घड्याळांपेक्षा जरा जास्तच होती. आकड्यांच्या ठिकाणी वेगळीच चित्रं होती. विशालनं ते घड्याळ उलटसुलट करून पाहिलं; तर त्याच्या मागच्या भागाचं झाकण सैल झालेलं दिसलं. म्हणून त्याने ते उघडलं. आतली दातेरी चक्रंही जरा विचित्रच होती. त्यानं त्या चक्रांना हलवून एकमेकांत अडकवायचा प्रयत्न केला. पाचेक मिनिटांनी त्याचे दाते व्यवस्थित अडकवण्यात त्याला यश आलं. त्यानं घड्याळ सुलटं केलं आणि चावी देऊन चालू करायचं म्हणून त्याने चावी फिरवायला सुरवात केली. आणि काय आश्चर्य! ते सुरू झालं की त्यातनं पिप्पिप् असा आवाज येऊ लागला. नंतर. .

"तू या बागेच्या दक्षिणेकडे कान्हेरी गुंफांकडे चालत जा."

आपल्या कानाशी कोण बोलतंय हे पहाण्यासाठी विशाल इकडंतिकडं पाहू लागला. तर त्याला त्या चौघांशिवाय कोणीच दिसेना.

"ताई, तू काही ऐकलंस?" विशालनं प्रश्न केला.

' कान्हेरी गुंफांकडे जा ' असं ऐकलं खरं, तनुजा पट्कन म्हणाली.

". . . त्या रस्त्यावर साधारणपणे दोन कि. मी. अंतरावर एक ओहोळ लागेल. मग. . ."

"अरे, हे तर घड्याळच बोलतंय की." अनुराधानं विशालचं लक्ष घड्याळाकडे वेधत म्हटलं, "बघ, ती चित्रं लालहिरव्या रंगांनी चमकताहेत. जणू काही बंद-चालू होणारे दिवेच."

विशालनं पाहिलं तर खरोखर त्या घड्याळातूनच आवाज येत होता.

". . . त्या ओहोळाच्या पलीकडेच उजव्या बाजूला जाणारी एक पाऊलवाट लागेल. त्या वाटेवरनं थोडं अंतर चाललं की, एका चिंचेच्या झाडावरील बुंध्याशी हिरव्या रंगाच्या दगडांची रास दिसेल. त्या वाटेवर हे एकमेव चिंचेचं झाड आहे."

एवढं बोलून ते घड्याळ थांबलं. चौघंही या प्रकारानं बरीच भांबावली होती. विशालनं पुन्हा त्याच्या दात्यांशी झटापट केली. पण घड्याळ काही बोलेना.

"मला वाटतं विशाल, कुणीतरी कसला तरी संदेश देतंय या घड्याळातून." अनुराधानं तर्क करायला सुरवात केली.

"पण मग हे घड्याळ इथं आलं कसं?" विशालनं विचारलं.

"कदाचित ती व्यक्ती इथं आली असेल आणि तिच्या हातून ते खाली पडलं असेल." तनुजा म्हणाली.

"आता काय करायचं रे विशाल?" रूपाली झाल्या प्रकारानं बरीच घाबरली होती. तीनं भीत भीतच विचारलं.

"तुला काय वाटतं ताई, हा संदेश कशाबद्दल असेल?" रूपालीच्या भित्रट प्रश्नाकडं दुर्लक्ष करीत विशालनं विचारलं.

"ज्या अर्थी एवढ्या आडरानात खुणा करून आणि सांगून बोलावण्याचा संदेश आहे; त्या अर्थी एक तर तो परदेशी गुप्तहेरांचा असावा किंवा स्मगलरांच्या टोळीचा तरी." अनुराधानं आपला तर्क सांगितला.

"याचा अर्थ ज्याच्याकडे हे घड्याळ होतं, तोही त्यांच्याच टोळीतील माणूस असावा. कोणास ठाऊक हे घड्याळ केव्हापासून इथे पडलंय ते. जर आत्ताच काही वेळापूर्वी पडलेलं असेल तर आणि त्याच्या लक्षात घड्याळ पडल्याचं आलं असेल तर तो ह्या बाजूला शोधत येण्याची शक्यताही आहे." विशाल म्हणाला.

"बापरे! चला बाई, ते घड्याळ टाकून आपण घरी जाऊ. त्यानं आपल्या हातात हे घड्याळ पाहिलं तर आपली धडगत नाही." रूपाली पुन्हा घाबऱ्याघुबऱ्या स्वरात म्हणाली.

"अरे चूप. जर या देशद्रोही लोकांना पकडायची संधी मिळत असेल तर का सोडायची? आपल्या पराक्रमानं आपल्याला राष्ट्रपतींच्या हस्ते 'बालवीर'-पुरस्कारही मिळेल कदाचित." विशाल आवेशानं म्हणाला.

"पुरस्कारबिरस्कार जाऊ दे. पण अशा देशद्रोह्यांना पकडणं आपलं कर्तव्यच आहे." अनुराधानं विशालला समज दिली.

"आणि ही संधी मिळतेय तर आपण का सोडावी? पण आपण पडलो लहान. तेव्हा कसं करायचं?" तनुजा म्हणाली.



"असं करू. घरी जाऊ आणि आपल्या विजयकाकाची मदत घेऊ." अनुराधा पोक्तपणे म्हणाली.

"हं, चला. ताबडतोब घरी जाऊ. काका आज घरीच आहे." रूपालीनं सुटकेचा श्वास सोडत घाई केली. तिला तो माणूस आला तर आपल्या हातात घड्याळ पाहून पकडेल अशी सारखी भीती वाटत होती.

विशाल जरा अनिच्छेनंच त्यांच्यांबरोबर घरी जायला निघाला. त्याला खरं तर घड्याळानं दिलेल्या संदेशानुसार त्या जागा पहायच्या होत्या. पण अनुराधानं त्याला रोखलं आणि आपल्याबरोबर घरी येण्यास भाग पाडलं.

घरी आल्याआल्याच रूपालीनं काकाला घाईघाईनं सांगायला सुरवात केली. आधी त्याला कळेना ती काय सांगतेय, एवढ्या घाईनं ती बोलत होती.

"काय गौडबंगाल आहे रे हे?" काकाने विशालला विचारलं.

विशालनं आणि अनुराधानं काकाला सविस्तर माहिती दिली. नंतर ते घड्याळ त्याच्या हातावर ठेवलं. काकानं ते उलटसुलट करून पाहिलं. उघडून आतील दात्यांना एकमेकांत अडकवून फिरवलं. मात्र. . . ते घड्याळ बोलू लागलं.

"आर. ओ ई. गेले चार दिवस आम्ही तुला सारखे संदेश देत आहोत. पण तुझ्याकडून कसलाही प्रतिसाद नाहीय. आज आपला पृथ्वीवरील शेवटचा दिवस आहे. आणि हे तुला माहीत आहे. आज रात्री ठीक अकरा वाजता आम्ही निघून जाणार आहोत. तू तुला दिलेली कामगिरी पूर्ण केलीस की नाही अजून? तू जर आम्ही जायच्या आत परत आला नाहीस तर तू आमच्याशी गद्दारी करतोयस असं समजून जाण्यापूर्वी आमच्याजवळ असलेल्या रिमोट कंट्रोलनं तुला वितळवून टाकू. तुला बाहेर सोडला हीच आमची चूक झाली असं वाटायला लागलंय. . . "

"काका, हा तर त्यांच्या टोळीतल्या बॉसचा आवाज दिसतोय. बघा ना कसा दटावल्यासारखा बोलतोय." विशालनं शंका प्रदर्शित केली.

"मला वाटतं काका, ही कोणती तरी भलीमोठी गँग असावी, की खरंच परग्रहस्थ असतील हो? पृथ्वीवरचा आजचा त्यांचा शेवटचा दिवस म्हणतोय तो." तनुजा विचार करीत म्हणाली.

"पण त्याच्या बोलण्यावरून गूढताच निर्माण होतेय." अनुराधा म्हणाली.

"काका, चला आपण त्या परग्रहस्थांना भेटूया ना. म्हणजे पृथ्वीवरील परग्रहस्थांना भेटणाऱ्या पहिल्या मानवांचा मान मिळेल आपल्याला." उडत्या तबकड्यांच्या बातम्यांवर विश्वास ठेवणाऱ्या रूपालीनं सांगितलं.

"ए, आता तुम्ही गप बसता की नाही? त्याचं पुढचं काय म्हणणं आहे ते तरी ऐकू दे." मुलांच्या बोलण्यामुळे घड्याळातील माणसाचे बोलणे नीट ऐकू न आल्यामुळे काका वैतागून पण गंभीरपणे म्हणाला.

"...तू मुळात रस्ता विसरलासच कसा? की, तुला पृथ्वीवरील माणसांनी मोहवून टाकलंय? की, तुझ्या मेंदूत काही बिघाड झाला आहे? लक्षात घे, आपण पृथ्वीवर आलोय ते येथील माणसांचा अभ्यास करण्यासाठी जमल्यास एखाद्या श्रीमंत माणसाला पकडून त्याला आपल्या ग्रहावरही न्यायचंय आपल्याला आणि त्याच कामगिरीसाठी तुला बाहेर पाठवला होता. पण तू बाहेर पडल्यापासून काहीच संदेश पाठविला नाहीस. काय झालंय तुला? आता वेळ कमी आहे, तू ताबडतोब परत ये."

काही क्षण घड्याळाचं बोलणं बंद पडलं. काकासह सगळी पोरं भारावलेल्या विचित्र अवस्थेत घड्याळातील परग्रहस्थ माणसांचं बोलणं ऐकत होती.

"चल काका, ताबडतोब तिकडे जाऊया आणि त्या परग्रहस्थांना पकडूया." विशाल भानावर येत घाईनं म्हणाला, "अरे पण हे काम आपल्याला वाटतं तेवढं सोपं नाहीय. समजा ते आपल्यापेक्षा पुढारलेले असते तर? आयतं सावज मिळाल्यासारखं आपण त्यांच्या हातात पडू." काका विचार करीत म्हणाला.

"पण काका, आता नऊ वाजताहेत आणखी दोन तासांनी ते निघूनसुद्धा जातील. "विशाल, मला असं वाटतंय की, ते परग्रहस्थ नसावेच मुळी.- गेले काही वर्षे उलटच्या तबकड्यांच्या अफवा मोठ्या प्रमाणावर पसरल्यामुळे त्याचा आधार घेऊन स्मगलर मंडळी आपल्याला फसवण्यासाठी अशा युक्त्या करीत असावीत." अनुराधानं एक नवीनच मुद्दा उपस्थित केला. "हो, नाहीतर त्याने एखाद्या श्रीमंत माणसाला पकडून" असा शब्दप्रयोग केलाच नसता. त्यांना काय कोणताही माणूस चालला असता; जर ते खरोखरच परग्रहस्थ असते तर. मला वाटतं ही त्यांची खुणेची भाषा असावी."



काकालाही अनुराधाचं म्हणणं पटायला लागलं होतं. त्याला आता या नवीन दिशेमुळं जाणवलं आपण काहीतरी जलद हालचाल केली पाहिजे. नाहीतर ते तथाकथित परग्रहस्थ पळूनही जातील. त्यानं ताबडतोब त्याचे मित्र इन्स्पेक्टर शहाणेंना फोन केला. थोडक्यात सांगून ताबडतोब दोन जीप घेऊन तयार राहायला सांगितले आणि तो स्वतः या चार बहाद्दरांना घेऊन पोलीस स्टेशनकडे निघाला.

पंधरा मिनिटांत त्यांच्या गाड्या नॅशनल पार्कच्या दिशेने धावू लागल्या होत्या. रस्त्यात जाताना शहाणेकाकांना विशाल व अनुराधाने साद्यंत माहिती दिली.

आता ते संदेशाप्रमाणे ओहोळाजवळ येऊन ठेपले होते. साडेदहा वाजायला आले होते. रातकिड्यांची किरकिर चालू होती. सगळीकडे अंधार गुडूप होता. जीपचे हेडलाईट बंद केले होते. शहाणेंनी आपल्याबरोबर आलेल्या पोलिसांना सूचना देऊन त्या परिसराभोवती जाळं पसरायला सुरुवात केली. रूपाली आणि तनुजाला ड्रायव्हरच्या हवाली करून ते, विजयकाका, विशाल व अनुराधा खुणेच्या दिशेने चालू लागले. पोलिसांनीही त्या दिशेने कूच करून जाळं आवळायला सुरुवात केली. चिंचेचे झाड शोधत असतानाच विशालला समोरच काही अंतरावरून हिरव्या रंगाचा प्रकाश दिसला. प्रकाशझोत पंख्यासारखा गोलगोल फिरू लागला होता आणि मच्छरांच्या गुणगुणण्यासारखा आवाज येऊ लागला. इन्स्पेक्टर शहाणे प्रकाशाच्या दिशेने धावत सुटले. धावता धावता गळ्यातील मायक्रोफोनवरून पोलिसांनाही प्रकाशाच्या दिशेने जलदपणे चहूबाजूने वेढा घालण्याची सूचना दिली. हालचाली जलद गतीने व्हायला लागल्या. प्रकाशझोतही वेगाने पंख्यासारखा फिरू लागला होता. त्याबरोबर गुणगुणण्याचा आवाजही वाढायला लागला होता.

टप्प्यात आल्याबरोबर शहाणेंनी हातातून एक वस्तू त्या दिशेने भिरकावली आणि दुसऱ्या क्षणीच एक प्रचंड स्फोट झाल्याचा आवाज झाला. त्या प्रकाशात उडत्या तबकडीसारखं एक यान विशालला दिसलं. शिंग असलेली दोन माणसंही त्याला दिसली.

क्षणार्धात चहुबाजूंनी त्या यानाला गराडा घालण्यात आला आणि त्या मंडळींना भांबावलेल्या अवस्थेतून बाहेर येण्याच्या आतच जेरबंद करण्यात

आलं. मग विजयकाकाने आपल्याबरोबर आणलेला सेलवर चालणारा दिवा लावला.

इन्स्पेक्टर शहाणेंनी म्होरक्याला बाहेर बोलावलं. तो यानातून बेशुद्ध अवस्थेत बाहेर आणला गेला. त्यालाही दोन शिंगे होती. शहाणेनी झटकन त्याची शिंगे ओढली. तो काय त्याचा मुखवटाच त्याच्या हातात आला.

आणि विशाल ओरडला, "अरे हा तर चार्ल शोभराज!"

❋ ❋ ❋